खेळांना प्रोत्सहन देण्यासाठी माध्यमिक शाळा / कनिष्ठ महाविद्यालय यांना प्रोत्साहन अनुदान देण्याकरिता निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१७ /प्र.क्र ११/क्रीयुसे -२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १४ फेब्रुवारी, २०१७

**वाचा-**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. राक्रीधो २०१२/प्र.क्र.२५९/क्रीयुसे-१, दि.२६.०२.२०१४.

२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं - २०१६ / प्र.क्र ८९ / अर्थसं-३ ,दि.२०.०४.२०१६ .

३. क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्र.क्रीयुसे /प्रोअनिवि/२०१६-१७/का-४, दि.२३.०१.२०१७.

**प्रस्तावना -**

संदर्भाधीन क्र.०३ च्या पत्रान्वये सन २०१६-१७ या वर्षातील जिल्हा, राज्य व आंतरराष्ट्रीय शालेय क्रीडा स्पर्धेत प्राविण्यप्राप्त शाळांना प्रोत्साहनात्मक अनुदान देण्यासाठी निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. त्या अनुषंगाने या योजनेत सन २०१६-१७ मध्ये रु. २०१.८० लक्ष एवढ्या अनुदानाच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१६-१७ या वर्षाकरीता जिल्हा, राज्य व आंतरराष्ट्रीय शालेय क्रीडा स्पर्धेत प्राविण्य मिळविणाऱ्या माध्यमिक शाळा/कनिष्ठ महाविद्यालय यांना प्रोत्साहन अनुदान देण्यासाठी रु. २५२.२५ लक्ष निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी रु. २०१.८० लक्ष तरतूद वितरित करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च " मागणी क्र.ई -३, २२०४ क्रीडा व युवक सेवा - १०४ क्रीडा व खेळ (२०) माध्यमिक शाळा व कनिष्ठ महाविद्यालय व खेळांचे प्रचालन (२०) (०३) खेळांना प्रोत्सहन देण्यासाठी माध्यमिक शाळा/कनिष्ठ महाविद्यालय यांना प्रोत्साहन अनुदान (२२०४-५६६२), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. सदर योजनेअंतर्गत खेळाडूंना शिष्यवृत्ती मंजूर करतांना संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयामधील तरतूदी लागू राहतील.

४. वित्त विभागाच्या दि.२०/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

४.१. वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

४.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

४.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४.४. दि.२४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

४.५. परिपत्रकातील “अ” व “ब” ची पूर्तता होत आहे.

५. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ व दि.२४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानूसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित विभागीय उपसंचालक/ जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा )यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२१५१२३६५९४६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.02.15 12:37:37 +05'30'

**( कि. ल. संखे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव
२) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, (क्रीडा संचालनालयामार्फत).
७) सर्व उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत).
८) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, ( क्रीडा संचालनालयामार्फत)
९) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती, क्रीयुसे-२.